**आयब्रेस्ट स्कॅनर मशिन खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः** खरेदी-२०१७/प्र.क्र.७१ /आरोग्य-८
नविन मंत्रालय, गोकुळदास तेजपाल रुग्णालय कंपांउंड,
कॉम्पलेक्स बिल्डींग, १० वा मजला, मुंबई ४००००१
दिनांक: ०२ जुलै २०१८

**संदर्भ :- १**) जिल्हा परिषद नागपुर आरोग्या विभाग यांचे पत्र जा.क्र.जिपना/ आरोगय आबेस्कॅ/तामा/९८१/दिनांक ५.२.२०१८
२) आरोग्य सेवा संचनालय यांचे पत्र क्र.संआसे/खरेदी कक्ष/साहित्या सामुग्री खरेदी/अहमदनगर /४५३८-३९/१८दिनांक २.६.२०१८

**प्रस्तावना :-**

प्रधानमंत्री खनिज क्षेत्र कल्याण योजनेमधुन स्त्रियांचे स्त्नकर्करोग तपासणी करिता आयब्रेस्ट स्कॅनर मशिन खरेदी करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याबाबत संदर्भीय पत्रान्वये शासनास प्रस्ताव प्राप्त झाला आहे. त्यानुसार आयब्रेस्ट स्कॅनर मशिन खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आरोग्य सेवा संचालनालयाने संदर्भीय दिनांक ०२.०६.२०१८ रोजीच्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने प्रधानमंत्री खनिज क्षेत्र कल्याण योजनेमधुन स्त्रियांचे स्त्नकर्करोग तपासणी करिता आयब्रेस्ट स्कॅनर मशिन खरेदी करण्यासाठी जिल्हा परिषद नागपूर यांना निधी प्राप्त झाला आहे. सदर निधीतून प्रतीनग अंदाजित रु.५,६०,०००/- किंमतीचे एकूण ६ नग खरेदी करण्यासाठी रूपये ३३,६०,०००/- रुपये तेहतिस लाख साठ हजार फक्त इतक्या रक्कमेची. प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे सदर खर्च प्रधानमंत्री खनिज क्षेत्र कल्याण योजने अंर्तगत निधीतून करण्यासाठी खालिल अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

१) सदर आयब्रेस्ट स्कॅनर मशिन आवश्यकता, उपयोगिता या बाबींची तसेच मागणीची शहानिशा/खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर उपकरणाची खरेदी करण्यात यावी.

२) सदर उपकरणाचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करावी. खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञांनी (तांत्रिक समिती/अधिकारी यांनी) मान्य केलेल्या विनिर्देशानूसार असावेत. तसेच सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच या बाबींची खरेदी करण्यात यावी.

३) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे खरेदी प्रक्रियेअंती निश्चित करण्यात आलेला दर हा कोणत्याही भावापेक्षा जास्त नसावा तसेच संबंधित पुरवठादाराने या उपकरणासाठी आकारलेला दर व या उपकरनांचा इतर ठिकाणी पुरवठा केलेल्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खाजरजमा करण्यात यावी.

४) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठापूर्व/ पुरवठानंतर नमुना तपासणी (Pre/Post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात येईल, याची खात्री करण्यात यावी.

५) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

६) सदर खरेदीची द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

७) संपुर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रीय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

८) प्रस्तावावरील खरेदी केंद्रशासनाच्या जीईएम(GEM) या खरेदी पोर्टलवरून करताना उदयोग उर्जा व कामगार विभागाच्या दिनांक **२४.८.२०१७** च्या शासन निर्णयामधील अटी व शर्ती च्या अधीन राहून विहित पध्दतीने करावी किंवा ई निविदा पध्दतीने करावी.

९) सदर खरेदी करतांना बाजार भावाची खात्री करूनच खरेदीचे दर निश्चित करण्यात यावेत.

१०) सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी आहे.त्यावरच खर्ची करण्यात यावेत .

११) खरेदी कार्यवाही प्राप्त अनुदान मर्यादेतच करणेत यावी जास्तीचा खर्च अनुज्ञेय असणार नाही.याची दक्षता घेण्यात यावी .

१२) केलेल्या कार्यवहीचा अहवाल शासनास सादर करावा

१३)मशीनचा वापर व देखभाल ( A.M.C ) या बाबत खरेदीदार संबधित विक्रेत्याशी (M.O.U) करेल.

१४) आयब्रेस्ट स्कॅनर हया उपकरणाचे उत्पादक तसेच किंमत याची आयुक्त आरोग्य सेवा संचालनालय स्तरावर शहनिशा करुन त्यांनी आवश्यक उपकरणांची खरेदी नियमानुसार करावी.

शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग दोन मधील अ.क्र.४, नियम क्र. ७ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानूसार सदरहू प्रस्तावास मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६२०१४४५५२०६१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Varsha Munjaji Bharose

Digitally signed by Varsha Munjaji Bharose
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2f3096a175796cc670522c4aff97da20b708981b5122e87c8346c4cc7468f821, serialNumber=1bd844032884bbf2167bc99cd85325223aceef69d02bd455b7ca6972491623e0, cn=Varsha Munjaji Bharose
Date: 2018.07.02 13:07:21 +05'30'

(व.मुं.भरोसे)
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
२. संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
३. सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
४. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) , आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
५. संबंधीत कार्यक्रम प्रमुख ( प्रा.आ.केंद्र,उपकेंद्रे,दवाखाने मुंबई)
६. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई
७. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), नागपूर
८. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
९. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१०.जिल्हा कोषागार अधिकारी,
११.जिल्हा आरोग्या अधिकारी जिल्हा परिषद नागपूर
१२.निवडनस्ती